पदस्थापना
उप अभियंता (स्थापत्य)

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः संकिर्ण-२०२१/प्र.क्र.४६/सेवा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: २२ /४/२०२२

**शासन आदेश**

सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत असलेले श्री. मधुकर राज्या गावित, उप अभियंता (स्थापत्य) यांना त्यांनी केलेल्या विनंतीनुसार पदस्थापना देण्याची बाब विचाराधीन होती. महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांचे बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार व सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने, श्री. मधुकर राज्या गावित, उप अभियंता (स्थापत्य) यांची पदस्थापना उप कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग, पेण, जि.रायगड या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. मधुकर राज्या गावित, उप अभियंता (स्थापत्य ) यांनी त्यांच्या नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा. त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल, तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता देखील नाकारता येत नाही, याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच त्यांचे लक्ष शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र.सीडीआर-१०८२/ २५६७/ २८/ अकरा, दिनांक ३०/८/१९८२ कडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील, याचीही नोंद घ्यावी.

३. संबंधित नियंत्रण अधिका-यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. मधुकर राज्या गावित, उप अभियंता (स्थापत्य) यांचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहीत कालावधीत संबंधित अधिकारी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से.(रजा) नियम, १९८१ मधील नियत ३०(सी) नुसार बदली झालेल्या अधिका-याचा रजेचा अर्ज स्वीकारु नये/ मंजूर करु नये.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०४२२१७०९३३३८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PATIL SWATI SACHIN

Digitally signed by PATIL SWATI SACHIN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=a08a4a756cd7e1e1ea2a6f91922d10f103cebd44790093322544672eefd3784b, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=41A9218232BBAEA65861213D86D108EA7C48905DA5F33DBA9C8F6662CB8F9E18, cn=PATIL SWATI SACHIN
Date: 2022.04.22 17:10:21 +05'30'

**( स्वा.स.पाटील )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१ / २ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई
३. मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग (सा.बां.)विभाग, कोकणभवन, नवी मुंबई
४. अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, मुंबई/ अधीक्षक अभियंता, राष्ट्रीय महामार्ग मंडळ, कोकणभवन, नवी मुंबई
५. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई / निवासी लेखा अधिकारी, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
७. श्री. मधुकर राज्या गावित, उप अभियंता (स्थापत्य) यांना मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचेमार्फत
८. मा. मंत्री, सार्वजनिक बांधकाम (उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
९. मा. मंत्री सार्वजनिक बांधकाम (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१०.अपर मुख्य सचिव (सा.बां.) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.सचिव (रस्ते) यांचे स्वीय सहाय्यक, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. सचिव (बांधकामे) यांचे स्वीय सहाय्यक , सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन आस्थापना- १/३, सेवा-६, सा.बां.विभाग,मंत्रालय, मुंबई,
१४. कार्यासन सेवा-२ (निवडनस्ती) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई.